**सांगली व सोलापूर जिल्ह्यातून जाणा-या रस्त्याची राज्यमार्ग म्हणून दर्जोन्नती करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१७/प्र.क्र.२१५/नियोजन-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- ११ सप्टेंबर, २०१८

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र क्रमांक मुअ(पुणे)/का-२/रेशा/१७९/४६५६/२०१७ दि. २८/०८/२०१७.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र क्रमांक मुअ(पुणे)/का-२/रेशा/५५/४९५४/२०१७ दि. २१/०७/२०१८.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांनी संदर्भाधिन पत्रांन्वये सांगली व सोलापूर जिल्ह्यातून जाणा-या **राज्यहद्द ते उमराणी - खोजानवाडी - जत - निगडी खुर्द - येळवी - खैराव - लोणार - जाडर बोबलाद - सोन्याळ ते राज्यमार्ग क्र.१५५ रस्ता** या ६२.५०० कि.मी. लांबीच्या रस्त्याची राज्यमार्ग म्हणुन दर्जोन्नती करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे.

सदर रस्ता हा महाराष्ट्र व कर्नाटक या राज्यांना जोडणारा महत्त्वाचा रस्ता आहे. या रस्त्यामुळे पर्यटन, शेतीमाल वाहतूक, औद्योगीक वाहतूक इत्यादींची चांगली सोय होणार आहे. या रस्त्यावर ५३,१६५ लोकसंख्येचे जत हे तालुक्याचे गांव असून रस्त्यावरुन वाहतूक वर्दळ ५७०७ मे.टन प्रतिदिन आहे. सदर रस्त्याचा एकुण होणारा वापर विचारात घेता सदर रस्ता राज्यमार्ग म्हणुन दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचा प्रस्ताव व स्थानिक लोकप्रतिनिधींची मागणी विचारात घेऊन सांगली व सोलापूर जिल्ह्यातून खालील रस्ता **राज्यमार्ग क्र. ३८५** म्हणून दर्जोन्नत करण्यात येत आहे.

| अ. क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | समाविष्ठ रस्त्यांचा क्रमांक | जिल्हा/ तालुका | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | राज्यहद्द ते उमराणी - खोजानवाडी - जत - निगडी खुर्द - येळवी - खैराव - लोणार - जाडर बोबलाद - सोन्याळ ते राज्यमार्ग क्र.१५५ रस्ता. | प्रमुख जिल्हा मार्ग- ६७ | सांगली (ता. जत) | (०/००ते ४८/४००) ४८.४०० कि.मी. | ६२.५०० कि.मी. | राज्यमार्ग क्र. ३८५ |
| | | ग्रामीण मार्ग-१७२ | सोलापूर (ता. मंगळवेढा) | (०/०० ते १/५००) १.५०० कि.मी. | | |
| | | ग्रामीण मार्ग ८६ | सोलापूर (ता. मंगळवेढा) | (०/०० ते ३/००) ३.०० कि.मी. | | |
| | | प्रमुख जिल्हा मार्ग- ६८ | सांगली (ता. जत) | (०/०० ते ९/६००) ९.६०० कि.मी. | | |

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२१ मधील सांगली जिल्ह्यातील **राज्यमार्ग** दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **५८.०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (१३४१.४९५ + ५८.००) म्हणजेच **१३९९.४९५कि.मी.** इतकी व **प्रमुख जिल्हा मार्ग** दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **५८.०० कि.मी.** ने घट होऊन एकूण लांबी (२७९१.९६० - ५८.००) म्हणजेच **२७३३.९६० कि.मी.** इतकी होईल. तसेच सोलापूर जिल्ह्यातील **राज्यमार्ग** दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत ४.५०० कि.मी. ने वाढ होवून एकूण लांबी (१४३६.१९५ + ४.५००) म्हणजेच **१४४०.६९५ कि.मी.** इतकी व **ग्रामीण मार्ग** दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **४.५०० कि.मी.** ने घट होऊन एकूण लांबी (९६०२.८७५ - ४.५००) म्हणजेच **९५९८.३७५ कि.मी.** इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१८०९१११६३३०९९६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2018.09.11 16:37:29 +05'30'

**( प्रशांत पाटील )**

अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, पुणे.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

३) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, कोल्हापूर व सोलापूर (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

४) जिल्हाधिकारी,सांगली.

५) जिल्हाधिकारी,सोलापूर

६) कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद, सोलापूर

७) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम पश्चिम विभाग, सांगली.

८) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई

९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

१०) निवडनस्ती.